# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक पोप्रमा-०९१७/प्र.क्र.४९८/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक १७ जुलै २०१८.

**विषय** :- पोलीस अधीक्षक, गडचिरोली, यांच्या अधिकारक्षेत्रातील उपपोलीस ठाणे, जिमलगट्टा, तालुका-अहेरी, जिल्हा-गडचिरोली, येथील पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांच्याकरिता प्रकार-३ चे एक शासकीय निवासस्थान बांधण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ गडचिरोली-उपपोस्टे-जिमलगट्टा-निवा./२१३/१७, दिनांक ०४.०८.२०१७.

**ज्ञापन.-**

पोलीस अधीक्षक, गडचिरोली, यांच्या अधिकारक्षेत्रातील उपपोलीस ठाणे, जिमलगट्टा, तालुका-अहेरी, जिल्हा-गडचिरोली, येथील पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांच्याकरिता प्रकार-३ चे एक शासकीय निवासस्थान बांधण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, अहेरी, यांनी सन २०१५-१६ च्या जिल्हा दरसूचीनुसार तयार केलेले रु.४७.७७ लक्ष इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आलापल्ली व पोलीस अधीक्षक, गडचिरोली, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते **रु.४४.६८ लक्ष** असे सुधारित केले आहेत आणि विवक्षित अटींवर प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, पोलीस अधीक्षक, गडचिरोली, यांच्या अधिकारक्षेत्रातील उपपोलीस ठाणे, जिमलगट्टा, तालुका-अहेरी, जिल्हा-गडचिरोली, येथील पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांच्याकरिता प्रकार-३ चे एक शासकीय निवासस्थान बांधण्यासाठी **रु.४४.६८ लक्ष** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुशास्त्रज्ञाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.

२) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करताना शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४, अनुसार कार्यवाही करावी.
४) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक बीडीजी-२०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ०७.०७.२०१७, अनुसार कार्यवाही करण्यात यावी.
५) निधी उपलब्ध झाल्याशिवाय बांधकामास सुरवात करु नये.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००)(०५) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माणसाठी बांधकाम करणे, (४०७० ०१५१), ५३, मोठी बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६९१/इमा-२, दिनांक ०९.१०.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७१७१४२९१००६२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.07.17 14:30:32 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस उपमहानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, मुक्काम-नागपूर.
३) पोलीस अधीक्षक, गडचिरोली.

**प्रतः-**
१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, गडचिरोली *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी दिलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आलापल्ली, जिल्हा-गडचिरोली *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी दिलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
३) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
७) निवड फाईल (पोल-७).